**केंद्र शासन सहाय्यित प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) सन २०२१-२२ मध्ये राबविण्यासाठी सर्वसाधारण प्रवर्गाकरिता रु.२२०७.४१ लाख निधी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मस्त्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. प्रअयो-२०२१/प्र.क्र. १२०/९-अे**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
तारीख:- ३० डिसेंबर, २०२१

वाचा- १. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१२०/९-अे, दि. २३.१२.२०२०
२. केंद्र शासनाचे कार्यालयीन पत्र क्र. FM-११/६०/२०२१-FME, दि. २२.०६.२०२१
३. उप सचिव (कार्यासन २-अे), कृषि व पदमु विभाग यांचे पत्र क्र. संर्कीण २०२१/प्र.क्र. ५५/२-अे, दि. ९.९.२०२१
४. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१२०/९-अे, दि. १२.१०.२०२१
५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. १४ ऑक्टोबर, २०२१
६. केंद्र शासनाचे कार्यालयीन पत्र क्र. FM-११/५३/२०२१-FME, दि. ०९.११.२०२१
७. नोडल अधिकारी (PMFME) तथा संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. पीएमएफएमई/वित्तीयमान्य प्रस्ताव २१-२२/३८४१९/२०२१, दि. २४.११.२०२१

**प्रस्तावना :-**

केंद्र शासन पुरस्कृत प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (Prime Minister Scheme for Formalization of Micro Food Enterprises (PMFME) योजना राज्यात सन २०२०-२१ पासून पुढील पाच वर्षासाठी म्हणजे सन २०२४-२५ पर्यंत राबविण्यास वरील वाचा येथील दि. २३.१२.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. सदर योजना सन २०२१-२२ मध्ये राज्यात राबविण्याकरिता वरील वाचा येथील दि. १२.१०.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये रु. ६८.०८ कोटी एवढया रकमेच्या आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. केंद्र शासनाने वरील वाचा येथील दि.२२.०६.२०२१ रोजीच्या पत्रानुसार सर्वसाधारण प्रवर्गाचा पहिला हप्ता रक्कम रु.१०८९.८३ लाख निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीमध्ये जमा केला आहे. तसेच वरील वाचा येथील दि.९.११.२०२१ च्या पत्रान्वये वैयक्तिक सूक्ष्म प्रक्रिया उद्योगांना केंद्र हिस्सा अनुदान थेट नोडल बँकेस (युनियन बँक ऑफ इंडिया) वितरीत केला आहे. त्यामुळे राज्याकडे जमा झालेला केंद्र हिस्सा व वैयक्तिक सूक्ष्म प्रक्रिया उद्योगांना मिळालेले केंद्र हिस्स्याचे अनुदान विचारात घेऊन त्याप्रमाणात समरुप राज्य हिस्सा अशी एकूण रु. २२०७.४१ लाख (केंद्र व राज्य) एवढा निधी कृषि आयुक्तालयास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासन पुरस्कृत प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) सन २०२१-२२ मध्ये राज्यात राबविण्याकरिता खालील कोष्टकात नमुद केल्याप्रमाणे सर्वसाधारण प्रवर्गाचा रु. २२०७.४१ लाख (रुपये बावीस कोटी सात लाख एकेचाळीस हजार फक्त) एवढा निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | | रु. लाखात |
|---|---|---|
| **केंद्र हिस्सा (२०२१-२२)** | | १०८९.८३ |
| **राज्य हिस्सा** | | १११७.५८ |
| समरुप राज्य हिस्सा (२०२१-२२) | ७२६.५५ | |
| समायाजित करावायाचा राज्याचा हिश्याचा निधी (२०२०-२१) | २४१.०३ | |
| वैयक्तिक लाभार्थी अनुदानास राज्य हिस्सा (२०२१-२२) | १५०.०० | |
| | एकूण रु. | २२०७.४१ |

२. सदरहू निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| | | |
|---|---|---|
| **केंद्र हिस्सा** | मागणी क्र. डी-३<br>२४०१-पीक संवर्धन<br>१०२-अन्नधान्य पिके<br>(००)(३५) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (सर्वसाधारण) (केंद्र हिस्सा ६० %)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१ B३३९) | Demand No. D-3<br>2401-Crop Husbandry<br>102-Food Grain Crop<br>(00)(35) Pradhan Mantri Micro Food Processing Industry Scheme (General)<br>(Central Share 60 %)<br>33- Subsidies (2401 B339) |
| **राज्य हिस्सा** | मागणी क्र. डी-३<br>२४०१-पीक संवर्धन<br>१०२-अन्नधान्य पिके<br>(००)(३६) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० %)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१ B३४८) | Demand No. D-3<br>2401-Crop Husbandry<br>102-Food Grain Crop<br>(00)(36) Pradhan Mantri Micro Food Processing Industry Scheme (General)<br>(State Share 40 %)<br>33- Subsidies (2401 B348) |

३. चालू वर्षी या योजनेअंतर्गत निधी उपलब्ध करुन दिल्यानंतर तो प्रथमत सन २०२०-२१ मधील प्रलंबित प्रकरणांसाठी वापरण्यात यावा.

४. संदर्भांकित शासन निर्णय दि. २३/१२/२०२० अन्वये विहित केलेल्या तरतुदींनुसार सदर योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी व त्यानुषंगाने योजना सन २०२१-२२ मध्ये राबविण्याकरिता मार्गदर्शक सूचना कृषि आयुक्तालय स्तरावरून निर्गमित कराव्यात.

५. सदर योजना सन २०२१-२२ मध्ये राबविण्याकरिता नोडल एजन्सी, प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) तथा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक

अधिकारी तर सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. या योजनेंतर्गत केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने नोडल एजन्सी, प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) तथा आयुक्त (कृषी) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र व राज्य शासनास सादर करावे.

७. निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित अटी व शर्ती तसेच वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११२३०१२४५०५५६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षंकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Digitally signed by Hemant Gorakhnath Mhapankar
Date: 2021.12.30 12:47:00 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) मा. मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४) मा. राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
५) मा. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) अपर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११) अपर मुख्य सचिव, कौशल्य विकास उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) प्रधान सचिव (पदुम), कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३) सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१४) राज्य नोडल एजन्सी (पीएमएफएमई) तथा आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, पुणे.
१५) राज्य नोडल अधिकारी (पीएमएफएमई) तथा संचालक (कृषी प्रक्रिया व नियोजन), पुणे.
१६) सर्व विभागीय कृषी सह संचालक, महाराष्ट्र राज्य.
१७) सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी/तालुका कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१८) सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१९) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता)/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.
२०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२१) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
२२) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२३) सह संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई-३२.
२४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२५) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई - ३२
२६) कक्ष अधिकारी (का.१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२७) कक्ष अधिकारी (अर्थ.-१३/ व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२८) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२९) निवड नस्ती-९अे.